“कोविड-१९” या साथीच्या रोगाचे documentation करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आ.व्य.प्र-२०२०/प्र.क्र.९२(भाग-५)/आ.व्य.प्र-१**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक :- २२ जून, २०२०.**

**प्रस्तावना :**

राज्यामध्ये कोरोना विषाणूची लागण झाल्यापासून त्याचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी केंद्र व राज्य शासन स्तरावरुन उपाययोजना करण्यासंदर्भात विविध आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. त्या उपाययोजनांचा एक भाग म्हणून राज्यामध्ये लॉकडाऊन घोषित करण्यात आला तसेच वेळोवेळी तो वाढविण्यातही आला. अद्यापही हा लॉकडाऊन काही प्रमाणात शिथिलता देऊन चालूच आहे. या लॉकडाऊनच्या कालावधीतच कोरोना विषाणूशी लढा देण्याबाबत तसेच त्याचे नियंत्रण करण्याच्या अनुषंगाने क्षेत्रीय यंत्रणांनीही विविध प्रकारच्या नाविन्यपुर्ण उपाययोजनाही केल्या आहेत. कोविड-१९ साथीचा रोग हा इतर साथीच्या रोगांपासून खूप वेगळा असून अशा प्रकारच्या साथीच्या रोगाशी लढा देताना तो राज्यातील यंत्रणांना इतर देशांच्या अनुभवावरुन निर्णय घ्यावे लागलेले आहेत. यापुर्वी होऊन गेलेल्या साथीच्या रोगांचे नियंत्रण कशा प्रकारे करण्यात आलेले होते त्याबाबतची माहिती उपलब्ध झाली असती तर आणखी अधिक चांगल्या प्रकारे कोविड-१९ चा लढा राज्यास देता आला असता. परंतु पुर्वीचे असे काहीही documentation उपलब्ध नाही. त्यामुळे भविष्यात अशा प्रकारची साथ आल्यास त्याचे प्रभावी नियंत्रण करण्याच्या अनुषंगाने कोविड-१९ बाबत करण्यात आलेले सर्व उपाययोजनांचे प्रभावी documentation करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

कोविड-१९ सारखे साथीचे रोग भविष्यात आल्यास त्याचे प्रभावी नियंत्रण करण्याच्या अनुषंगाने कोविड-१९ बाबत करण्यात आलेले सर्व उपाययोजनांचे प्रभावी documentation करण्याकरीता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

१) कोविड-१९ बाबत करावयाच्या documentation ची जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांचेवर सोपविण्यात येत आहे.

२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांनी या प्रयोजनार्थ त्यांच्या अध्यक्षतेखाली त्यांच्या कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी यांचा एक गट तयार करावा.

३) शासनाने कोविड-१९ चा प्रादुर्भाव रोखण्यासाठी गठीत केलेल्या कोरोना नियंत्रण कक्षामध्ये व त्याव्यतिरिक्त वेळोवेळी स्वतंत्र आदेशान्वये नियुक्त केलेल्या वरिष्ठ प्रशासकीय अधिका-यांशी संपर्क साधून केलेल्या नाविन्यपूर्ण उपाययोजनांबाबतच्या (Best Practices) माहितीचे संकलन सदर गटाने करावे.

४) याचप्रमाणे कोविड-१९ मुळे प्रभावित झालेली आर्थिक, सामाजिक व प्रशासकीय व्यवस्था पुनश्च सुरळीत करण्याकरीता शासनाने गठीत केलेल्या मंत्रीगट / तज्ञ समिती इत्यादिद्वारे करण्यात आलेल्या प्रयत्नांसंदर्भात देखील माहितीचे संकलन सदर गट करेल.

५) तसेच सदर गटाने राज्यातील विविध प्रशासकीय विभागांना आणि क्षेत्रिय कार्यालयांना भेटी देऊन तेथील अभिलेख उपलब्ध करुन घेऊन कोरोनाशी लढा याबाबतची व्यवस्थितपणे मांडणी करुन त्याचे documentation करावे. त्याकरीता आवश्यक ते सर्व सहकार्य तसेच अभिलेख संबंधित अधिकारी, प्रशासकीय विभाग व क्षेत्रिय कार्यालयांनीही सदर गटास उपलब्ध करुन देण्यात यावे.

६) उपरोक्त documentation करण्याकरीता येणारा सर्व खर्च हा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांनी करावा.

७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांनी याबाबत केलेल्या कार्यवाहीचा अहवाल थेट मुख्य सचिव यांना सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००६२२१२४८१५६३१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

किशोरराजेनिंबाळकर

**(किशोर राजे निंबाळकर)**
**सचिव**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) माननीय महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे प्रधान सचिव, मुंबई.
२) माननीय सभापती, महाराष्ट्र विधान परिषद.
३) माननीय अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा.
४) माननीय मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) माननीय उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) माननीय विरोधी पक्षनेता, विधान परिषद /विधानसभा यांचे खाजगी सचिव.
७) सर्व माननीय मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) महाराष्ट्र शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, नेपेयन सी रोड, प्रियदर्शनी पार्क, मुंबई
११) संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) राज्यातील सर्व विभागीय आयुक्त.
१३) राज्यातील सर्व पोलीस आयुक्त.
१४) राज्यातील सर्व महानगरपालिका आयुक्त.
१५) सर्व जिल्हाधिकारी.
१६) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१७) राज्यातील सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक.